**पुनर्रचित हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना सन २०१८-१९ मध्ये मृग बहाराकरिता राज्य हिस्सा ५०टक्के निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- विमायो-२०१८/प्र.क्र.२५/१३-अे,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २४ सप्टेंबर, २०१८

**संदर्भ :-** १) कृषि व पदु म विभाग शा.नि. क्र.विमायो-२०१८/प्र.क्र.२५/१३-अे,, दि.२५-४-२०१८
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/फलो-१/पुहआफपिकवयोअ.मा/२६१७/२०१८, दि.०३/०९/२०१८.
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २/४/२०१८.

**प्रस्तावना:-**

शेतकऱ्यांच्या फळ पिकांना हवामान धोक्या पासुन विमा संरक्षण दिल्यास शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य आबाधीत राखण्याच्या दृष्टीने मदत व्हावी, त्यासाठी राज्यात प्राधान्याने पुनर्रचित हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना सन राबविण्यात येत आहे. विविध हवामान धोक्यांमुळे फळपिकाच्या उत्पादकतेवर विपरीत परीणाम होऊन मोठ्या प्रमाणावर उत्पादनामध्ये घट होते. पर्यायाने शेतकऱ्यांना अपेक्षीत उत्पादन न मिळाल्याने शेतकऱ्याला आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागते. या सर्व बाबींचा विचार करुन शेतकऱ्यांना फळपिक नुकसान भरपाई मिळण्यासाठी एक उपाय म्हणुन पुनर्रचित हवामान आधारीत पीक विमा योजना संत्रा, मोसंबी, डाळिंब, पेरु व चिकू,द्राक्ष, लिंबू, केळी व आंबा या ९ पिकांसाठी महसूल मंडळ हा घटक धरुन राबविण्यांचे प्रस्तावित आहे. त्यासाठी महसूल मंडळामध्ये किमान २० हेक्टर अधिसूचित फळ पिकांचे उत्पादनक्षम क्षेत्र असणे आवश्यक आहे.

प्रधानमंत्री पीक विमा योजनेतंर्गत पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना सन २०१८-१९ (मृग बहार) मध्ये राबविण्यासाठी संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णय क्र. विमायो-२०१८/प्र.क्र.२५/१३-अे, दि २५ .एप्रिल २०१८,अन्वये मृग बाहारासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. योजनेत सन २०१८-१९ मृग बहारासाठी सहभागी कंपन्यांनी मागणी केल्यानुसार राज्य हिस्सा अनुदानाची मागणी कृषि आयुक्तालयाने सादर केल्यानुसार राज्य हिस्साच्या ५० टक्के रक्कमेस वित्तीय मान्यता देण्याची, निधी वितरणाबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** -

पुनर्रचित हवामान आधारित पीक विमा योजना सन २०१८-१९ (मृग बहार) मध्ये राबविण्यासाठी विमा कंपनीकडून राज्य हिस्साची मागणी रक्कम रु. ११६,९४,७६,११४/-करण्यात आलेली आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेत हंगाम सुरू झाल्यानंतर एकुण अंदाजीत मागणीच्या ५० टक्के रक्कम अग्रीम स्वरूपात देणे आवश्यक असल्याचे नमूद आहे. त्यानुसार सन २०१८ मृग बहारामधील एकुण मागणीच्या ५० टक्के अनुदान मागणीस खालील विवरणपत्रा प्रमाणे कंपनी निहाय राज्य हिस्साच्या रक्कमेस वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सन २०१८ मृग बहाराचे कंपनी निहाय विवरणपत्र

| अ. क्र. | विमा कंपनीचे नाव | एकुण अंदाजित विमा हप्ता (रक्कम रू.) | राज्य हिस्सा विमा कंपनीने मागणी केलेली (रक्कम रु.) | राज्य हिस्साच्या ५० टक्के अनुदान (रक्कम रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | टाटा ए. आय.जी. इन्शुरन्स कंपनी | १५४,६२,५९,६४८ | ७७,३१,२९,८२३ | ३८,६५,६४,९१२ |
| २ | इफको टाकियो जनरल इन्शुरन्स कंपनी लि. | १६,७८,९५,९२० | ८,३९,४७,९६० | ४,१९,७३,९८० |
| ३ | दि न्यु इंडिया एश्योरन्स कंपनी लि. | २,७८,५४,४४० | १,३९,२७,२२० | ६९,६३,६१० |
| ४ | एस.बी.आय जनरल इन्शुरन्स कंपनी लि. | ५९,६९,४२,२२० | २९,८४,७१,११० | १४,९२,३५,५५५ |
| | एकूण | **२३३,८९,५२,२२८** | **११६,९४,७६,११४** | **५८,४७,३८,०५७** |

योजनेत उपरोक्त सहभागी कंपन्यांना शेतकऱ्यांना द्यावयाच्या अनुदानासाठी राज्य शासनाच्या हिस्सा पोटी देय होणारी रक्कम खालील लेखाशिर्षा खालील अर्थ संकल्पीय तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी- ३**
**लेखाशिर्ष २४०१ - पीक संवर्धन**
**११० (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना,**
**(००) (०७) पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजना**
**(२४०१ ९४०२), ३३ अर्थसहाय्य**

सदर ५० टक्के निधी रु. ५८,४७,३८,०५७/- (अठ्ठावन्न कोटी सत्तेचाळीस लाख अडतीस हजार सत्तावन्न) अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे कृषी आयुक्तालयास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२४१५५७३७८४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2018.09.24 17:10:56 +05'30'

**(अशोक आत्राम)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२.संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-०५
३.सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य,

४.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

५.अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई - ३२.

६.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

७.महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर

८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी पुणे.

९.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

१०. सहसंचालकलंखा व कोषागारे, संगणक, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२.

११. उपसचिव, नियोजन विभाग (कार्या.१४३१ /१४८१) / वित्त विभाग (व्यय-१)

१२. उपसचिव (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई - ०३२.

१३. सर्व सहसचिव /उपसचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई -३२

१४. निवडनस्ती -१३ अे